**माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना” या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ अस्थायी पद सन २०१९-२० मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी-०३.१९/प्र.क्र.९५/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ ऑक्टोंबर, २०१९

<u>वाचावे :-</u>

१. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ०४.१८/प्र.क्र.१२५/फ-१ दिनांक ०२.०४.२०१८.
२. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ०४.१८/प्र.क्र.१२५/फ-१ दिनांक ०६.१०.२०१८.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक २१.०२.२०१९.
४. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र कक्ष-३/ योजनेतर/ प्र.क्र. ०३/१८-१९/२०९१, दिनांक २१.०२.२०१९.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक: डब्ल्युएलपी ०३.१९/प्र.क्र.९५/फ-१ दिनांक १५.०३.२०१९.
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक ११.०९.२०१९.
७. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : एमएफएस. २०१७/ प्र.क्र. ७७/ फ-८, दिनांक १३.०९.२०१९.

<u>प्रस्तावना:-</u>

“माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना” या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ अस्थायी पदास सन २०१८-२०१९ मध्ये संदर्भ क्रमांक १ व २ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना” या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ अस्थायी पदास सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला होता.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले होते. त्यानुसार “माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना” या योजनेत्तर

योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ अस्थायी पदास सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती.

४. आता प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

I. संदर्भ क्रमांक ७ च्या शासन निर्णयान्वये वन विभागाचा निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबांधात "माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना" या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ अस्थायी पदाचा समावेश असल्यास वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयाच्या अधिन राहून सदर पदास सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

II. माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना" या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ अस्थायी पदाच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संवर्धन (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशू संरक्षण (२४०६ ०७६६) योजनेतर या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

III. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : असंक-१००४/प्र.क्र.१२ /(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/विसु-१, दिनांक ११.०२.२०१६, क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक २१.०९.२०१६, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दिनांक २१.०२.२०१९ व क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दिनांक ११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१७१४५७०१९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2019.10.17 14:58:46 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
६. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
८. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

*******